अखिलभारतीय–प्राच्यविद्यासम्मेलनम्
शतवर्षमहोत्सवग्रन्थमाला –९५

# वृत्तालोक

डॉ. कविता होले

प्रधानसंपादकः
आचार्यः श्रीनिवासः वरखेडी
कुलगुरु

संपादकः
आचार्यः मधुसूदनः पेन्ना
संचालकः संशोधन–प्रकाशनविभागः




राष्ट्रहिताय संस्कृतम्

कविकुलगुरु–कालिदास–संस्कृत–विश्वविद्यालयः
रामटेकम्, जि. नागपुरम् (महाराष्ट्रम्)

2020

अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला — ९५

# वृत्तालोक

डॉ. कविता होले

प्रधानसंपादक
**आचार्य श्रीनिवास वरखेडी**
कुलगुरु

संपादक
**आचार्य मधुसूदन पेन्ना**
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग




**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय**

**रामटेक, जि. नागपुर (महाराष्ट्र)**

| | | |
|---|---|---|
| **शीर्षक** | — | **वृत्तालोक** |
| **लेखक** | — | **डॉ. कविता होले** |
| **प्रधानसंपादक** | — | **आचार्य श्रीनिवास वरखेडी**<br>कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक |
| **संपादक** | — | **आचार्य मधुसूदन पेन्ना**<br>संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग,<br>क.का.सं.वि., रामटेक |
| **अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन** | — | **प्रो. गौतम पटेल,** अध्यक्ष<br>**प्रो. सरोजा भाटे,** सचिव<br>**प्रो. ग. उ. थिटे,** उपाध्यक्ष |
| **संपादक मंडळ** | — | **डॉ. दिनकर मराठे,** क.का.सं.वि., रामटेक<br>**डॉ. वीणा गानु,** नागपुर. |
| **प्रकाशन वर्ष** | — | **२०२०** |
| **आवृत्ती** | — | **प्रथम** |
| **मूल्य** | — | **रू. २४०/—** |
| **आय.एस.बी.एन.** | — | **९७८—९३—८५७१०—५२—०** |
| **मुखपृष्ठ** | — | **श्री. उमेश पाटील** |
| **मुद्रक** | — | **अवधूत ग्रॉफिक्स अॅण्ड प्रिन्टींग, नागपूर** |
| **प्रकाशक** | — | **कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक**<br>**प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक.** |

## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this

series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success.

My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

**सरस्वती श्रुतिमहती महीयताम्**

Ramtek — Prof. Shrinivasa Varakhedi
10th January 2020 — Vice Chancellor, KKSU

# Kavikulaguru Kalidas Sanskrit University
# All India Oriental Conference

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

## Chief Patron
Hon'ble Nitin Gadkari
Minister of Road, Transport & Highways of India

## Patron
Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU, Ramtek

## AIOC President
Prof. Gautam Patel
Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

## AIOC General Secretary
Prof. Saroja Bhate
Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

## AIOC Local Secretary
Prof. Penna Madhusudan
Dean, KKSU, Ramtek

## Additional Local Secretary
Dr. Harekrishna Agasti
Dr. Kalapini Agasti
Dr. Dinakar Marathe
Dr. Parag Joshi

## Organising Committee
Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek
Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek
Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek
Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek
Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek
Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek
Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek
Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek

Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek
Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Shrinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

## Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

# आमुख

संस्कृत साहित्यात गद्यापेक्षा पद्यनिर्मिती अधिक आहे. संस्कृतातील आद्य ग्रंथ ऋग्वेद हा छन्दबद्ध मंत्रांनी युक्त आहे. तर आद्य लौकिककाव्य ग्रन्थ रामायण वाल्मीकींनी ब्रह्मदेवाच्या आदेशाने अनुष्टुभ् छंदात रचलेला आहे. शास्त्रग्रंथांनीसुद्धा पाठांतरासाठी योग्य म्हणून सूत्रशैली स्वीकारलेली आहे. मनुष्याच्या स्मरणशक्तीचा विचार करून संस्कृततज्ज्ञांनी लक्षात ठेवण्यास सुकर आणि गेयतेमुळे व लयबद्धतेमुळे मनोरंजक म्हणून पद्यालाच अधिक प्राधान्य दिलेले दिसते. त्यामुळे संस्कृतसाहित्य प्रामुख्याने पद्यमय आहे असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

'छन्दः पादौ तु वेदस्य: वेद हे तर छंदावरच उभे आहेत. त्यामुळे छन्द ज्ञानाशिवाय वेद अगम्य असल्यामुळे छंदांना वेदाच्या षडङ्गांमध्ये स्थान मिळाले. तसेच लौकिकसाहित्यही छंद व वृत्तांच्या ज्ञानाशिवाय समजणे कठीण आहे. हे लक्षात घेऊनच पिंगलाचार्यांचे छन्दःसूत्र कालिदासाचा श्रुतबोध, क्षेमेन्द्राचे सुवृत्ततिलक यासारखे ग्रंथ निर्माण झाले.

या वृत्तांचे ज्ञान आजच्या पीढीला अत्यंत आवश्यक आहे. शालेय किंवा महाविद्यालयीन अभ्यासक्रमात छंद व वृत्तांचा अन्तर्भाव नसल्याने त्यांचे अध्ययन केले जात नाही. हे जाणून कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाने पदव्युत्तर स्तरावरील अभ्यासक्रमात छंद व वृत्तांचा अंतर्भाव केलेला आहे. परंतु त्यांना अभ्यासक्रमासाठी मराठीतून ग्रंथ उपलब्ध नाही. ही कमतरता या ग्रंथाने पूर्ण केलेली आहे. त्यासाठी लेखिका धन्यवादास पात्र आहे. सरल सोप्या भाषेत संस्कृतातील सुप्रसिद्ध श्लोकांसह वृत्तांचे विवरण लेखिकेने केलेले असल्याने विद्यार्थ्यांसाठी हे पुस्तक फारच उपयोगाचे ठरणार आहे.

नागपूर येथे दिनांक १० ते १२ जानेवारी, २०२० या दरम्यान होणाऱ्या अभूतपूर्व अखिल भारतीय प्राच्यविद्या अशा शतकपूर्ती परिषदेत या पुस्तकाच्या द्वितीय आवृत्तीचे प्रकाशन होत असल्याने लेखिकेसाठी ही बाब बहुमूल्य आणि अविस्मरणीय ठरणार आहे. यासाठी लेखिकेचे अभिनंदन करून तिला पुढील लेखनासाठी हार्दिक शुभेच्छा देते.

प्रा. डॉ. नन्दा पुरी
अधिष्ठाता, संस्कृत तथा संस्कृतेतर भाषा संकाय,
ककासंवि, रामटेक

# हृदगत

'वृत्तालोक:' हे पुस्तक वाचकांना समर्पित करतांना मला अतिशय आनंद होत आहे. कागदांवर लिहून ठेवलेले आपले लेखन कधीतरी पुस्तकरूपाने प्रकाशित होईल याची पुसटशीही कल्पना नव्हती. तो आपला प्रांत नाही ही त्यावेळी माझी धारणा होती. नागपुरच्या शासकीय तंत्रनिकेतन (गव्हर्नमेंट पॉलिटेक्नीक) मधून विद्युत अभियांत्रिकी पदविका प्राप्त केल्यानंतर संस्कृत साहित्यात आपण करिअर घडवू असे स्वप्नातही वाटले नव्हते. पण विधिलिखित काही औरच असल्याने सुवर्णपदकानिशी स्नातकोत्तर पदवी व नेट (संस्कृत) परीक्षा उत्तीर्ण केल्यानंतर कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयात 'अधिव्याख्याता' म्हणून नोकरीला लागले आणि लेखिका म्हणून प्रस्तुत पुस्तकाच्या रूपाने आपणासमोर उपस्थित झाले.

कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाच्या बी.ए. व एम्.ए. (संस्कृत) या अभ्यासक्रमांमध्ये छन्दांचा अभ्यास अंतर्भूत आहे. तसेच या अभ्यासक्रमात शिकणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी त्यांना अभ्यासक्रमाच्या काव्यग्रंथांमधील सामान्यपणे नेहमी येणारी वृत्ते ज्ञात व्हावी या उद्देशाने वृत्तांची ही हस्तपुस्तिका सादर करीत आहे.

केदार भट्ट प्रणित 'वृत्तरत्नाकर' आणि गङ्गादासविरचित 'छन्दोमञ्जरी' यातील वृत्तांची लक्षणेच यात घेतलेली आहेत. लक्षणांच्या उदाहरणादाखल आपल्या दैनंदिन जीवनात येणारे व कण्ठस्थीकरणासाठी अतिशय सोपे असे स्तुतिपर, उपदेशप्रद नीतीचे श्लोक घेतलेले आहेत. अतिशय सोप्या मराठीत असलेली छन्द:शास्त्राची व गणांची माहिती विद्यार्थ्यांना उपयोगी पडेल असा विश्वास आहे.

आभार - नागपूर येथे दिनांक १० ते १२ जानेवारी, २०२० या दरम्यान होणाऱ्या अखिल भारतीय प्राच्यविद्या शतकपूर्ती परिषदेत या पुस्तकाच्या द्वितीय आवृत्तीचे प्रकाशन होत आहे. विश्वविद्यालयातर्फे पुस्तक प्रकाशन करण्यास मंजुरी प्रदान केल्याबद्दल मा. कुलगुरू, प्रा. श्रीनिवास वरखेडी यांची मी ऋणिनी आहे.

समुचित प्रस्तावना देऊन विश्वविद्यालयाच्या संस्कृत तथा संस्कृतेतर भाषा संकायाच्या, माझ्या गुरुवर्या व प्रेरणास्रोत प्रा. नन्दा पुरी यांनी माझा गौरव वाढविला त्यांच्या प्रती मी ऋणभाव व्यक्त करते. सतत निरपेक्ष कौतुकाचा ओघ असलेले माझे कुटुंबीय, सहकारी यांचे आभार. सहृदय व गुणग्राही वाचक माझ्या या परिश्रमांना सफल करतील अशी आशा व्यक्त करते.

प्रा. डॉ. सौ. कविता सुनील होले
लेखिका

# अनुक्रमणिका

**अर्धसमवृत्त**

**जातिवृत्त**



**विषमवृत्त**

# वृत्तालोकः

## छन्दःशास्त्राचा परिचय

पणिनीय शिक्षा नामक ग्रंथात छन्दाला वेदपुरुषाच्या पादस्थानी मानले आहे. पायांमुळे मनुष्य गतिशील होतो, त्यशिवाय पङ्गु अशीच काहीशी स्थिती वेदांचीही आहे. म्हणूनच वेदांचे एक नाव 'छन्दस्' असेही आहे.

गायत्री, उष्णिक्, अनुष्टुप्, बृहती, पङ्क्ति, त्रिष्टुप् अणि जगती हे प्रमुख वैदिक छन्द, सप्तछन्दांसि या नावांनी निर्दिष्ट केले जातात. यांत छन्दांची अक्षरसंख्या क्रमशः चाराने वाढते.

पिंगल ऋषीप्रणित छन्दःसूत्र, जयदेवाचे जयदेवछन्द, जयकीर्तीचे छन्दानुशासन, केदारभट्टाचे वृत्तरत्नाकर, क्षेमेन्द्राचे सुवृत्ततिलक, कालिदासाचा श्रुतबोध, हेमचन्द्राचे छन्दोनुशासन गङ्गादासाची छन्दोमजरी हे छन्दःशास्त्राचे सुप्रसिद्ध ग्रंथ आहेत.

छन्दःशास्त्राच्या परवर्ती आचार्यांनी पिङ्गल ऋषींनाच आपला आधार मानला आहे. जयदेव, जयकीर्ती, केदारभट्ट अणि आचार्य पिङ्गलाचे अनुयायी आहेत. अग्निपुराणातही या दृष्टीकोनाचे समर्थन आहे.

**छन्दःशास्त्राचे महत्त्व -**

'छन्दः पादौ तु वेदस्य' असे शास्त्रकारांनी छन्दःशास्त्राचे महत्त्व व पठन-पाठनाची अनिवार्यता सिद्ध केलेली आहे.

**छन्दः शब्दाचा अर्थ -**

'छन्दस्' (छन्द) शब्दाचे दोन अर्थ आहेत.

१) आच्छादन अणि २) आह्लादन

१) आच्छादन् - निरुक्ताच्या दैवत्तकाण्डाच्या सातव्या अध्यायाच्या तृतीय पादात 'छन्दांसि छादनात्' असे लिहिले आहे. ज्याच्याद्वारा भाव किंवा रसाला आच्छादित केले जाते त्याला 'छन्द' असे म्हणतात. म्हणून छादकत्व

अर्थात् सीमाबन्धन करणे हे छन्दाचे सामान्य लक्षण आहे.

२) आह्लादन - चन्दयति (आह्लादयति) या व्युत्पत्तीने **‘चदि आह्लादने दीप्तौ च’** आह्लादनार्थक चदि धातु न ‘चदेरादेश्च छ:’ या सूत्राने ‘चन्द्’ च्या ‘च’ काराला ‘छ’ अणि ‘असून्’ प्रत्यय लावल्यावर ‘छन्दस्’ शब्द सिद्ध होतो. ज्याच्या द्वारा पाठकांना आह्लादन किंवा आनन्द प्राप्त होतो त्याला ‘छन्द’ असे म्हणतात.

**छन्दांचे प्रकार -**

छन्दांचे २ प्रकार असतात -

**मात्रा-वर्णविभेदेन छन्दो द्विविधमुच्यते।**
**विधां तृतीयमप्याहुरक्षरच्छन्दसा परे।।**

अर्थात् १) मात्राछन्द २) वर्णछन्द . काही आचार्य तीन प्रकारचे छन्द मानतात. १) गणछन्द २) मात्राछन्द ३) अक्षरछन्द. परंतु छन्दानेच अक्षरछन्दाचाही बोध होत असल्याने तृतीय अक्षरछन्दाला पृथक् मानची आवश्यकता नाही.

**१) मात्राछन्द (मात्रिक छन्द) -** हा केवळ मात्रांनी नियंत्रित होत असतो. म्हणजे यात प्रत्येक पादातील मात्रांचीच (स्वरांचीच) गणना होते. यालाच ‘जतिवृत्त’ असेही म्हणतात.

**२) वर्णछन्द (वर्णिकछन्द) -** हा वर्णांनी नियन्त्रित केला जातो. म्हणूनच यात वर्णांची अक्षरांची गणना प्रधान असते.

**पद्य - पदम् (चरणम्) अर्हतीति (पद्+यत्) पद्यम्।** प्रत्येक श्लोकाचे चार भाग असतात त्यातील प्रत्येक भागाला ‘चरण’ किंवा ‘पाद’ असे म्हणतात. वृत्ताची रचना चार-चार चरणांची असते. म्हणूनच वृत्तालाच ‘पद्य’ असे म्हणतात.

**पद्यांचे भेद -**

१) सम २) अर्धसम अणि ३) विषम असे पद्यांचे तीन भेद होतात.

१) ज्या पद्याच्या चारही चरणांमध्ये समान गण असतात त्यात **‘समवृत्त’** असे म्हणतात.

२) ज्या पद्याच्या प्रथम, तृतीय अणि द्वितीय व चतुर्थ चरणांमध्ये समान गण असतात त्याला **'अर्धसमवृत्त'** असे म्हणतात.

३) ज्या पद्याच्या चारही पादांमध्ये (चरणांमध्ये) भिन्न भिन्न प्रकारचे गण असतात त्याला **'विषमवृत्त'** असे म्हणतात.

**गुरु लघु विचार -**

ऱ्हस्व (लघु) स्वराची एक मात्रा अणि दीर्घ (गुरु) स्वराच्या दोन मात्रा असतात.

ऱ्हस्व (लघु) स्वर - अ, इ, उ, ऋ, ऌ

दीर्घ (गुरु) स्वर - आ, ई, ऊ, ॠ, ए, ऐ, ओ, औ

**गुरुलघु लेखनप्रकार -**

**वक्ररेखा गुरोश्चिह्नं सरला च लघोस्तथा।**
**गुरुरेको गकारस्तु लकारो लघुरेकक:।।**

गुरु अक्षराचे चिह्न वक्र रेखा म्हणजेच 'ऽ' असे असणे अणि लघु अक्षराचे चिह्न सरळरेषा '।' असते. गुरु चे सांकेतिक चिह्न 'ग' अणि लघु चे 'ल' असते.

**ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत संज्ञक स्वरांचे विवरण -**

**एकमात्रो भवेद् ऱ्हस्वो द्विमात्रो दीर्घ उच्यते।**
**त्रिमात्रस्तु प्लुतो ज्ञेयो व्यञ्जनं चाऽर्धमात्रकम्।।**

अर्थात् एकमात्रिक - एक मात्रा असणाऱ्या वर्णाला 'ऱ्हस्व', द्विमात्रिक - दोन मात्रा असणाऱ्या वर्णाला 'दीर्घ' अणि त्रिमात्रिक - तीन मात्रा असणाऱ्या वर्णाला 'प्लुत' असे म्हणतात. व्यंजनांची अर्धी मात्रा मोजली जाते.

**गुरु स्वराचा परिचय**

**सानुस्वारश्च दीर्घश्च विसर्गी च गुरुर्भवेत्।**
**वर्ण: संयोगपूर्वश्च तथा पादान्तगोऽपि वा।।**

अर्थात अनुस्वारयुक्त ऱ्हस्व वर्ण (अं, कं, चं, इ.) अणि दीर्घ वर्ण (आ, का, चा, इ.) विसर्गयुक्त (अः, कः, चः इ.) अणि संयुक्त अक्षराच्या पूर्वीचे अक्षर (जसे लक्ष्मी मध्ये ल, चन्द्र मध्ये च, इ.) गुरु होते. पादाच्या शेवटी असणाऱ्या ऱ्हस्ववर्णाला छन्दाच्या आवश्यकतेनुसार विकल्पाने गुरु (दीर्घ) किंवा लघु (ऱ्हस्व) मानले जाते.

**यति किंवा विराम -**

**यतिर्जिह्वेष्ट - विश्रामस्थानं कविभिरुच्यते।**
**सा विच्छेद - विरामाद्यैः पदैर्वाच्या निजेच्छया।।**

पद्य म्हणजेच श्लोक वाचतांना त्यातील भाव योग्यप्रकारे स्पष्ट करण्यासाठी जेथे जिह्वा स्वेच्छापूर्वक विराम करते त्या स्थानाला 'यति' किंवा 'विराम' असे म्हणतात. यति उच्चारण करणाऱ्याच्या इच्छेवर निर्भर असतो. यति किंवा विरामाने पद्यात श्रुतिसौकर्य अणि मधुरता येते.

**गण-परिचय -**

**मगणो यगणश्चैव रगणः सगणस्तथा।**
**तगणो जगणश्चैव भगणो नगणस्तथा।।**

१) म-गण २) य-गण ३) र-गण ४) स-गण ५) त-गण

६) ज-गण ७) भ-गण ८)न-गण असे आठ प्रकारचे गण असतात.

१) ज्यात तीनही अक्षर गुरु असतात त्याला **म-गण - ऽऽऽ**

२) ज्यात पहिले अक्षर लघु अणि बाकीचे दोन अक्षर गुरु असतात त्याला **य-गण - ।ऽऽ**

३) ज्याच्या मध्यात लघु व पहिले व शेवटचे अक्षर गुरु असते त्याला **र- गण - ऽ।ऽ**

४) ज्यात अन्ती गुरु, पहिले व मधले अक्षर लघु असते त्याला **स-गण - ।।ऽ**

५) ज्यात अन्ती लघु, पहिले व मधले अक्षर गुरु असते त्याला **त-गण - ऽऽ।**

६)	ज्यात मधले अक्षर गुरु, पहिले व शेवटचे अक्षर लघु असते त्याला **ज-गण - ।ऽ।**

७)	ज्यात पहिले अक्षर गुरु, शेवटचे दोन अक्षर लघु असतात त्याला **भ-गण - ऽ।।**

८)	ज्यात तीनही वर्ण लघु अर्थात् ऱ्हस्व असतात त्याला **न-गण ।।।** असे म्हणतात.

**मस्त्रिगुरुस्त्रिलघुश्च नकारो भदिगुरुः पुनरादिलघुर्यः।**
**जो गुरुमध्यगतो रलमध्यः सोऽन्तगुरुः कथितोऽन्तलघुस्तः।।**

खालील श्लोकातूनही गणांची महिती मिळू शकते -

**अदि-मध्याऽवसानेषु भ-ज-सा यन्ति गौरवम्।**
**य-र-ता लाघवं यन्ति म-नौ तु गुरुलाघवम्।।**

अर्थात् भ-गण, ज-गण अणि स-गणात अनुक्रमे प्रथम, मध्यम अणि अन्तिम वर्ण गुरु असतो. य-गण, र-गण, त-गणात अनुक्रमे आदि, मध्य, अन्त वर्ण लघु असतात. म-गणात तीनही वर्ण गुरु तर न-गणात तीनही वर्ण लघु असतात.

**गणबोधक सूत्र -**

**य-मा-ता-रा-ज-भा-न-स-ल-गम्।**

हे सूत्र सदैव लक्षात ठेवावे. गणाचा परिचय करणारे हे सूत्र आहे. आठ गणांमधील ज्या गणाचे स्वरूप हवे आहे. त्या गणाचे बोधक पहिले अक्षर घेऊन त्याच्या समोरील दोन अक्षर घेतल्याने त्या गणाचे स्वरूप कळते.

उदा. य-गण हवा असल्यास सूत्राचे प्रथमाक्षर ‘य’ अणि त्याच्या समोरील दोन अक्षरे ‘माता’ जोडल्याने ‘यमाता’ असे होते. हे य गणाचे स्वरूप प्रथम लघु अणि मध्य व अन्त गुरु.

य - गण - य मा ता - ।ऽऽ

म - गण - मा ता रा - ऽऽऽ

त - गण - ता रा ज - ऽऽ।

र - गण - रा ज भा - ऽ।ऽ

ज - गण - ज भा न - ।ऽ।

न - गण - न स ल - ।।।

स - गण - स ल गं - ।।ऽ

ल - ।

गम् - ऽ

वरील ८ गणांव्यतिरिक्त दोन अक्षरे सूत्रात दिसतात. ते म्हणजे ल अणि ग त्यांचा संकेत सूत्रात 'लगम्' या पदाने लघु चा 'ल' अणि गुरु चा 'ग' ने केला आहे.

## समवृत्त

**अनुष्टुप् (अनुष्टुभ्) छन्द -**

लक्षण - **श्लोके षष्ठं गुरु ज्ञेयं सर्वत्र लघु पञ्चमम्।**
**द्विचतुष्पादयोर्ह्रस्वं सप्तमं दीर्घमन्ययोः।।**

त्या छन्दाच्या चारही चरणांमध्ये सहावे अक्षर गुरु असते व पाचवे अक्षर लघु असते अणि द्वितीय व चतुर्थ चरणात सातवे अक्षर ऱ्हस्व असते. प्रथम तथा तृतीय चरणात सातवे अक्षर दीर्घ असते, त्याला 'अनुष्टुप्' (अनुष्टुभ्) छन्द असे म्हणतात. याच्या प्रत्येक चरणात आठ अक्षरे असतात. हे समवृत्त आहे. यांत यति पादान्ती असतो.

उदाहरण -

**(१)**

**श्लोकेषष्ठं गुरु ज्ञेयं। सर्वत्रा लघु पञ्चमम्।**
**। ऽ ऽ । ऽ ।**

**द्विचतुष्पादयोर्ह्रस्वं। सप्तमं दीर्घमन्ययोः।।**

**।ऽ ऽ । ऽ।**

(२)

**कराग्रे वसते लक्ष्मी करमध्ये सरस्वती।**

**।ऽऽ                    । ऽ।**

**करमूले तु गोविन्दं प्रभाते करदर्शनम्।।**

**। ऽ ऽ                  ।ऽऽ**

**गजगति -**

लक्षण - **नभलगा गजगतिः।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे न, भ, ल, ग असे गण येतात, त्याला 'गजगति' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात आठ अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात चवथ्या अक्षरावर व त्यानंतर चवथ्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (४, ४)

उदाहरण -

**न    भ  ल ग**

**रविसु तापरि सरे**

**।।।  ऽ।।  ।ऽ**

**विहर तोदृशि हरेः ।**

**।।।  ऽ।।  ।ऽ**

**व्रजव धूगज गति**

**।।।  ऽ।।  ।ऽ**

**र्मुदम लंव्यत नतु ।।**

**।।।  ऽ।।  ।ऽ**

**रविसुतापरिसरे विहरतो दृशि हरेः ।**

**व्रजवधूगजगतिर्मुदमलं व्यतनुत ।।**

**माणवक -**

लक्षण - **भात्तलगा माणवकम् ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे भ, त, ल, ग असे गण येतात, त्याला 'माणवक' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात आठ अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात चवथ्या अक्षरावर व त्यानंतर चवथ्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (४, ४)

उदाहरण -

**चंचल चूडंच पलै**

**ऽ।। ऽऽ। ।ऽ**

**र्वत्सकु लैःकेलि परम् ।**

**ऽ।। ऽऽ। ।ऽ**

**ध्यायस खेस्मेर मुखं**

**ऽ । । ऽ ऽ। ।ऽ**

**नन्दसु तंमाण वकम् ।।**

**ऽ।। ऽऽ। । ऽ**

**चंचलचूडं चपलैर्वत्सकुलैः केलिपरम् ।**
**ध्याय सखे स्मेरमुखं नन्दसुतं माणवकम् ।।**

**प्रमाणिका -**

लक्षण - **प्रमाणिका जरौ लगौ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे एक ज-गण, एक र-गण, एक लघु अक्षर व एक गुरु अक्षर असते त्याला, **'प्रमाणिका'** वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात आठ अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. प्रत्येक चरणात यति चवथ्या अक्षरावर व त्यानंतरच्या

चवथ्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (४, ४)

उदाहरण -

| ज | र | ल ग |
|---|---|---|
| **पुनातु** | **भक्तिर** | **च्युता** |
| । ऽ। | ऽ । ऽ | । ऽ |
| **सदाच्यु** | **तङिघ्रप** | **द्मयोः।** |
| । ऽ । | ऽ । ऽ | । ऽ |
| **श्रुतिस्मृ** | **तिप्रमा** | **णिका।** |
| । ऽ । | ऽ ऽ । | । ऽ |
| **भवाम्बु** | **राशिता** | **रि का।।** |
| । ऽ । | ऽ। ऽ | । ऽ |

**पुनातु भक्तिरच्युता**
**सदाऽच्युतङिघ्रपद्मयोः।**
**श्रुतिस्मृतिप्रमणिका**
**भवाम्बुराशितरिका।।**

**समानिका-**

लक्षण - **ग्लौ रजौ समानिका तु ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे ग, ल, र, ज असे गण येतात, त्याला 'समानिका' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात आठ अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात चवथ्या अक्षरावर व त्यानंतर चवथ्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (४, ४)

उदाहरण -

**ग ल र ज**

**य स्य कृष्णपा दपद्म**

**ऽ। ऽ। ऽ।ऽ।**

**म स्ति हृत्तडा गसद्म ।**

**ऽ । ऽ।ऽ ।ऽ।**

**धीः स मानिका परेण**

**ऽ । ऽ । ऽ ।ऽ।**

**नो चि तात्रम त्सरेण ।।**

**ऽ । ऽ।ऽ ।ऽ।**

उदा. **यस्य कृष्णपादपद्ममस्ति हृत्-तडागसद्म ।**
**धीः समानिका परेण नोचितात्र मत्सरेण ।।**

**विद्युन्माला -**

लक्षण - **मो मो गो गो विद्युन्माला।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे दोन म-गण व दोन गुरु अक्षरे येतात व प्रत्येक पादात सर्व गुरु अक्षरे असतात, त्याला 'विद्युन्माला' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात आठ अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. प्रत्येक चरणात यति चवथ्या व त्यानंतर चवथ्या म्हणजेच पादान्ती असतो. (४, ४)

उदाहरण - - १ -

**म म ग ग**

**वासोव ल्लीविद्यु न्माला**

**ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ**

**बर्हश्रे णीशाक्र श्चापः।**



**ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ**

**यस्मिन्ना स्तांतापौ छित्यै**

ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

**गोमध्य स्थ:कृष्ण म्भोद:।।**

ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

**वासोवल्ली विद्युन्माला**
**बर्हश्रेणी शाक्रश्चाप:।**

**यस्मिन्नास्तां तापौछित्यै**
**गोमध्यस्थ: कृष्णम्भोद:।।**

**मणिमध्य -**

लक्षण - **स्यान्मणिमध्यं चेद्‌भमसा:।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे भ, म, स असे गण येतात, त्याला 'मणिमध्य' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात नऊ अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात पाचव्या अक्षरावर व त्यानंतर चवथ्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (५, ४)

उदाहरण -

**भ म स**

**कालिय भोगाभो गगत**

ऽ ।। ऽ ऽ ऽ ।।ऽ

**स्तन्मणि मध्यस्फी तरुचा ।**

ऽ ।। ऽ ऽ ऽ ।।ऽ

**चित्रप दाभोन न्दसुत**

ऽ।। ऽऽऽ ।।ऽ

**श्चारुन नर्तस्मे रमुख:।।**



ऽ।। ऽऽऽ ।।ऽ

**कालियभोगाभोगगतस्तन्मणिमध्यस्फीतरूचा ।**
**चित्रपदाभो नन्दसुतश्चारु ननर्त स्मेरमुखः।।**

**मत्ता -**

लक्षण - **ज्ञेया मत्ता मभसगसृष्टा ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे म, भ, स, ग असे गण येतात, त्याला 'मत्ता' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात दहा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात चवथ्या अक्षरावर व त्यानंतर सहाव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (४, ६)

उदाहरण -

**म भ स ग**
**पीत्वाम त्तामधु मधुपा ली**
**ऽ ऽ ऽ ऽ।। ।।ऽ ऽ**
**कालिन्दी येतट वनकु ञ्जे ।**
**ऽ ऽ ऽ ऽ।। ।।ऽ ऽ**
**उद्दीव्य न्तीर्ब्रज जनरा माः**
**ऽऽऽ ऽ।। ।।ऽ ऽ**
**कामासि क्तामधु जितिच क्रे ।।**
**ऽ ऽ ऽ ऽ।। ।।ऽ ऽ**

**पीत्वा मत्ता मधु मधुपाली**
**कालिन्दीये तटवनकुञ्जे ।**
**उद्दीव्यन्तीर्ब्रजजनरामाः**
**कामासिक्ता मधुजिति चक्रे ।।**

**इन्द्रवज्रा -**

लक्षण - **स्यदिन्द्रवज्रा यदि तौ जगौ गः।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे दोन त-गण, एक ज-गण अणि दोन गुरु अक्षरे असतात, त्याला 'इन्द्रवज्रा' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अकरा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात पाचव्या अक्षरावर व त्यानंतर सहाव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (५, ६)

उदाहरण - -१-

| त | त | ज | ग ग |
|---|---|---|---|
| **श्रीकृष्ण** | **गोविन्द** | **हरेमु** | **रा रे** |
| ऽ ऽ । | ऽ ऽ । | । ऽ। | ऽ ऽ |
| **हेनाथ** | **नाराय** | **णवासु** | **देव।** |
| ऽ ऽ। | ऽ ऽ। | । ऽ। | ऽ ऽ |
| **जिह्वेपि** | **बस्वामृ** | **तमेत** | **देव** |
| ऽ ऽ । | ऽ ऽ । | । ऽ। | ऽ ऽ |
| **गोविन्द** | **दामोद** | **रमाध** | **वे ति।।** |
| ऽ ऽ । | ऽ ऽ। | । ऽ। | ऽ ऽ |

**श्रीकृष्ण गोविन्द हरे मुरारे**
**हे नाथ नारायणवासुदेव।**
**जिह्वेपि बस्वामृतमेत देव**
**गोविन्द दामोदरमाधवेति।।**

-२-

| त | त | ज | ग ग |
|---|---|---|---|
| **लोकाभि** | **रामंर** | **णरङ्ग** | **धीरं** |
| ऽ ऽ । | ऽ ऽ। | । ऽ । | ऽ ऽ |

| | | | |
|---|---|---|---|
| **राजीव** | **नेत्रंर** | **घुवंश** | **नाथम्।** |
| ऽ ऽ । | ऽ ऽ। | । ऽ। | ऽ ऽ |
| **कारुण्य** | **रूपंक** | **रुणाक** | **रं तं** |
| ऽ ऽ । | ऽ ऽ। | । ऽ । | ऽ ऽ |
| **श्रीराम** | **चन्द्रंश** | **रणंप्र** | **पद्ये।।** |
| ऽ ऽ । | ऽ ऽ । | । ऽ। | ऽ ऽ |

**लोकाभिरामं रणरङ्गधीरं**
**राजीवनेत्रं रघुवंशनाथम्।**
**कारुण्यरूपं करुणाकरं तं**
**श्रीरामचन्द्रं शरणं प्रपद्ये।।**

**उपेन्द्रवज्रा -**

लक्षण - **उपेन्द्रवज्रा ज-त-जास्ततो गौ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात क्रमाने एक ज-गण, एक त-गण, एक ज-गण अणि दोन गुरु अक्षरे येतात, त्याला 'उपेन्द्रवज्रा' वृत्त असे म्हणतात. यात अकरा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यात यति पाचव्या व त्यानंतरच्या सहाव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (५, ६)

उदाहरण -

| **ज** | **त** | **ज** | **ग ग** |
|---|---|---|---|
| **त्वमेव** | **माताच** | **पितात्व** | **मेव** |
| । ऽ। | ऽ ऽ। | । ऽ । | ऽ ऽ |
| **त्वमेव** | **बन्धुश्च** | **सखात्व** | **मेव** |
| । ऽ। | ऽ ऽ । | । ऽ । | ऽ ऽ |
| **त्वमेव** | **विद्याद्र** | **विणंत्व** | **मेव** |
| । ऽ। | ऽ ऽ । | । ऽ । | ऽ ऽ |

| | | | |
|---|---|---|---|
| **त्वमेव** | **सर्वम** | **मदेव** | **देव।।** |
| । ऽ। | ऽ ऽ। | । ऽ। | ऽ ऽ |

**त्वमेव माता च पिता त्वमेव**
**त्वमेव बन्धुश्चसखा त्वमेव।**
**त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव**
**त्वमेव सर्व मम देव देव।।**

**उपजाति -**

लक्षण - **अनन्तरोदीरितलक्ष्मभाजौ**
**पादौ यदीयावुपजातयस्ता।**
**इत्थं किलान्यास्वपि मिश्रितासु**
**वदन्ति जातिष्विदमेव नाम।।**

या वृत्ताच्या आधी जे इन्द्रवज्रा (दोन त गण, एक ज गण, दोन गुरु अक्षरे) व उपेन्द्रवज्रा, (एक ज गण, एक त गण, एक ज गण, दोन गुरु अक्षरे) वृत्त सांगितलेले आहेत त्या दोघांच्या लक्षणांनी युक्त चरण ज्या वृत्तात असतात, त्याला 'उपजाति' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अकरा अक्षरे असतात. यात यति पाचव्या व त्यानंतरच्या सहाव्या अक्षरावर म्हणजे पादान्ती असतो. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. (५, ६)

दुसऱ्या समानाक्षर चरण असणाऱ्या वृत्तांच्या संमिश्रणानेही 'उपजाति' वृत्त होते.

उदा - (१)

| | | | |
|---|---|---|---|
| **त** | **त** | **ज** | **ग ग** |
| **कर्पूर** | **गौरंक** | **रुणाव** | **ता रं** |
| ऽऽ। | ऽ ऽ। | । ऽ । | ऽ ऽ |
| **त** | **त** | **ज** | **ग ग** |
| **संसार** | **सारंभु** | **जगेन्द्र** | **हारम्।** |
| ऽ ऽ। | ऽ ऽ। | । ऽ । | ऽऽ |

| | | | |
|---|---|---|---|
| ज | त | ज | ग ग |
| सदाव | सन्तंह्द | दयार | विन्दे |
| । ऽ। | ऽ ऽ। | । ऽ। | ऽ ऽ |
| ज | त | ज | ग ग |
| भवंभ | वानीस | हितंन | ममि।। |
| । ऽ। | ऽ ऽ। | । ऽ। | ऽ ऽ |

कर्पूरगौरं करुणावतारं
संसारसारं भुजगेन्द्रहारम्।
सदावसन्तं हृदयारविन्दे
भवं भवानी सहितं नममि।।

(२)

| | | | |
|---|---|---|---|
| ज | त | ज | ग ग |
| मनोज | वंमारु | ततुल्य | वेगं |
| । ऽ। | ऽ ऽ। | । ऽ। | ऽ ऽ |
| ज | त | ज | ग ग |
| जितेन्द्रि | यंबुद्धि | मतांव | रिष्ठम्। |
| । ऽ । | ऽऽ। | । ऽ। | ऽ ऽ |
| त | त | ज | ग ग |
| वातात्म | जंवान | रयूथ | मुख्यं |
| ऽ ऽ । | ऽ ऽ । | । ऽ। | ऽ ऽ |
| त | त | ज | ग ग |
| श्रीराम | दूतंश | रणंप्र | पद्ये।। |
| ऽ ऽ। | ऽऽ। | ।ऽ। | ऽऽ |

**मनोजवं मारुततुल्यवेगं**
**जितेन्द्रियं बुद्धिमतां वरिष्ठम्।**
**वातात्मजं वानरयूथमुख्यं**
**श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये।।**

**दोधक -**

लक्षण - **दोधकमिच्छति भ-त्रितयाद् गौ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात क्रमाने तीन भगण अणि दोन गुरु अक्षरे असतात, त्याला 'दोधक' वृत्त असे म्हणतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यात यति सहाव्या व त्यानंतरच्या पाचव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (६, ५)

उदाहरण - (१)

| | | | |
|---|---|---|---|
| **भ** | **भ** | **भ** | **ग ग** |
| **देवस** | **दोधक** | **दम्बत** | **लस्थ** |
| ऽ। । | ऽ। । | ऽ । । | ऽ ऽ |
| **श्रीधर** | **तावक** | **नामप** | **दंमे** |
| ऽ। । | ऽ। । | ऽ। । | ऽ ऽ |
| **कण्ठत** | **लेसुवि** | **निर्गम** | **काले** |
| ऽ । । | ऽ। । | ऽ ।। | ऽ ऽ |
| **स्वल्पम** | **विक्षण** | **मेष्यति** | **योगम्** |
| ऽ । । | ऽ । । | ऽ। । | ऽ ऽ |

**देव! सदोधकदम्बतलस्थ**
**श्रीधर तावक नामपदं मे।**
**कण्ठतलेऽसुविनिर्गमकाले**
**स्वल्पमविक्षणमेष्यति योगम्।।**

(२)

**आद्यचतुर्थमिहाक्षरमुक्तं**

**सप्तमकं दशमं च तथाऽन्त्यम्।**

**छन्दसि यत्रा गुरुत्वसमेतं**

**तत्कथितं ननु दोधकवृत्तम्।।**

**भ्रमरविलसितम् -**

लक्षण - **म्भौ न्लौ गःस्याद् भ्रमरविलसितम् ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे म, भ, न, ल, ग असे गण येतात, त्याला ‘भ्रमरविलसितम्’ वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अकरा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात चवथ्या अक्षरावर व त्यानंतर सातव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (४, ७)

उदाहरण -

**म भ न ल ग**

**प्रीत्यैयू नांव्यव हितत प नाः**

**ऽ ऽऽ ऽ।। ।।। । ऽ**

**प्रौढध्वा न्तांदिन मिहज ल दाः ।**

**ऽ ऽऽ ऽ।। ।।। । ऽ**

**दोषाम न्यंविद धतिसु र त**

**ऽ ऽऽ ऽ।। ।।। । ऽ**

**क्रीडाया सश्रम शमप ट वः।।**

**ऽ ऽ ऽ ऽ।। ।।। । ऽ**

**प्रीत्यै यूनां व्यवहिततपनाः**

**प्रौढध्वान्तं दिनमिह जलदाः ।**

**दोषामन्यं विदधति सुरत**

**क्रीडायासश्रमशमपटवः।।**

**वातोर्मी -**

लक्षण - **वातोर्मीयं गदिता म्भौ तगौ गः ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे म, भ, त, ग, ग असे गण येतात, त्याला 'वातोर्मी' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अकरा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात चवथ्या अक्षरावर व त्यानंतर सातव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (४, ७)

उदाहरण -

**म भ त त ग**

**ध्यातामू र्त्तिःक्षण मप्यच्यु त स्य**

**ऽ ऽ ऽ ऽ । । ऽऽ । ऽ ऽ**

**श्रेणीना म्नांगदि ताहेल याऽपि ।**

**ऽऽ ऽ ऽ ।। ऽऽ। ऽ ऽ**

**संसारेऽ स्मिन्दुरि तंहन्ति पुं साम्**

**ऽ ऽ ऽ ऽ । । ऽऽ। ऽ ऽ**

**वातोर्मी पीतमि वाम्भोधि म ध्ये ।।**

**ऽऽऽ ऽ ।। ऽ ऽ । ऽ ऽ**

**ध्याता मूर्त्तिः क्षणमप्यच्युतस्य**

**श्रेणी नाम्नां गदिता हेलयाऽपि ।**

**संसारेऽस्मिन् दुरितं हन्ति पुंसाम्**



**वातोर्मी पीतमिवाम्भोधिमध्ये ।।**

**स्वागता -**

लक्षण - **स्वागता रनभगैर्गुरुणा च ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे र, न, भ, ग, ग असे गण येतात, त्याला 'स्वागता' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अकरा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात तिसऱ्या अक्षरावर व त्यानंतर आठव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (४, ७)

उदाहरण -

**र न भ ग ग**

**यावदा गमय तेऽथन रे न्द्रान्**

**ऽ।ऽ ।।। ऽ ।। ऽ ऽ**

**सस्वयं वरम हायम ही न्द्रः ।**

**ऽ।ऽ ।।। ऽ।। ऽ ऽ**

**तावदे वऋषि रिन्द्रदि दृ क्षुः**

**ऽ।ऽ ।।। ऽ ।। ऽ ऽ**

**नारद स्त्रिदश धामज गा म ।।**

**ऽ।ऽ ।।। ऽ ।। ऽ ऽ**

**यावदागमयतेऽथ नरेन्द्रान्**

**स स्वयंवरमहाय महीन्द्रः ।**

**तावदेव ऋषिरिन्द्रदिदृक्षुः**

**नारदस्त्रिदशधाम जगाम ।।**

**इन्द्रवंशा** -

लक्षण - **तच्चेन्द्रवंशा प्रथमाक्षरे गुरौ ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे त, त, ज, र असे गण येतात, त्याला 'इन्द्रवंशा' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात बारा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात पाचव्या अक्षरावर व त्यानंतर सातव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (५, ७)

इन्द्रवंशा अगदी वंशस्थविल किंवा वंशस्थ वृत्तासारखे असते. फरक इतकाच की याचे प्रथमाक्षर गुरु असते.

उदाहरण -

**त त ज र**

**दैत्येन्द्र वंशाग्नि रुदीर्ण दीधितिः**

**ऽऽ। ऽ ऽ । ।ऽ। ऽ।ऽ**

**पीताम्ब रोऽसौज गतांत मोपहः।**

**ऽऽ। ऽ ऽ । ।ऽ। ऽ।ऽ**

**यस्मिन्म मज्जुःश लभाइ वस्वयम्**

**ऽ ऽ । ऽ ऽ । ।ऽ। ऽ । ऽ**

**तेकंस चाणूर मुखामु खद्विषः।।**

**ऽऽ। ऽऽ। ।ऽ। ऽ।ऽ**

**दैत्येन्द्रवंशाग्निरूदीर्णदीधितिः**

**पीताम्बरोऽसौ जगतां तमोपहः।**

**यस्मिन् ममज्जुः शलभा इव स्वयम्**

**ते कंसचाणूरमुखा मुखद्विषः।।**

**रथोद्धता -**

लक्षण - **रात्परैर्नरलगै रथोद्धता।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात क्रमाने एक र-गण, एक न-गण, एक र-गण, एक लघु व एक गुरु अक्षर असते, त्याला 'रथोद्धता' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अकरा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. प्रत्येक चरणात यति तिसऱ्या व आठव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (३, ८)

उदाहरण - (१)

| **र** | **न** | **र** | **ल ग** |
|---|---|---|---|
| **कौशिके** | **नसकि** | **लक्षिती** | **श्वरो** |
| ऽ । ऽ | । । । | ऽ । ऽ | । ऽ |
| **रामम** | **ध्वरवि** | **घातशा** | **न्तये** |
| ऽ । ऽ | । । । | ऽ । ऽ | । ऽ |
| **काकप** | **क्षधर** | **मेत्य** | **यचित** |
| ऽ । ऽ | । । । | ऽ । ऽ | । ऽ |
| **स्तेजसा** | **हिनव** | **यःसमी** | **क्ष्यते** |
| ऽ । ऽ | । । । | ऽ । ऽ | । ऽ |

**कौशिकेन स किल क्षितीश्वरो**
**राममध्वरविघातशान्तये।**
**काकपक्षधरमेत्य यचित**
**स्तेजसा हि न वयः समीक्ष्यते।।**

**शालिनी -**

लक्षण - **मात्तौ गौ चेच्छालिनी वेदलोकैः।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे एक म-गण, दोन त-गण व दोन गुरु अक्षरे असतात, त्याला 'शालिनी' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अकरा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे.

यति प्रत्येक चरणात चवथ्या व त्यानंतरच्या सातव्या अक्षरावर म्हाजेच पादान्ती असतो. (४, ७)

उदाहरण - (१)

| म | त | त | ग ग |
|---|---|---|---|
| मातारा | मोमत्पि | ताराम | चन्द्रः |
| ऽ ऽ ऽ | ऽ ऽ। | ऽ ऽ। | ऽ ऽ |
| स्वामीरा | मोमत्स | खाराम | चन्द्रः। |
| ऽ ऽ ऽ | ऽ ऽ। | ऽ ऽ। | ऽ ऽ |
| सर्वस्वं | मेराम | चन्द्रोद | यालुर् |
| ऽ ऽ ऽ | ऽ ऽ। | ऽ ऽ। | ऽ ऽ |
| नान्यंजा | नेनैव | जानेन | जाने।। |
| ऽ ऽ ऽ | ऽ ऽ। | ऽ ऽ। | ऽ ऽ |

**माता रामो मत्पिता रामचन्द्रः**
**स्वामी रामो मत्सखा रामचन्द्रः।**
**सर्वस्वं मे रामचन्द्रो दयालुर्**
**नान्यं जाने नैव जाने न जाने।।**

(२)

| म | त | त | ग ग |
|---|---|---|---|
| आज्ञाकी | र्तिःपाल | नंब्राह्म | णा नां |
| ऽ ऽ ऽ | ऽ ऽ। | ऽऽ। | ऽ ऽ |
| दानंभो | गोमित्र | संरक्ष | णं च। |
| ऽऽऽ | ऽ ऽ। | ऽऽ। | ऽ ऽ |
| येषामे | तेषड् | गुणान | प्रवृत्ताः |
| ऽ ऽ ऽ | ऽ ऽ। | ऽ ऽ। | ऽ ऽ |
| कोर्थस्ते | षांपर्थि | वोपाश्र | येण।। |
| ऽ ऽ ऽ | ऽ ऽ। | ऽ ऽ। | ऽ ऽ |

**आज्ञाकीर्तिःपालनंब्राह्मणानां**
**दानं भोगो मित्रसंरक्षण च।**
**येषामेते षड्गुणा न प्रवृत्ताः**
**कोऽर्थस्तेषां पर्थिवोपाश्रयेण।।**

**जलधरमाला -**

लक्षण - **अब्ध्यंगैः स्याज्जलधरमालाम्भौ स्मौ ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे म, भ, स, म असे गण येतात, त्याला 'जलधरमाला' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात बारा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात चवथ्या अक्षरावर व त्यानंतर आठव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (४, ८)

उदाहरण-

**म भ स म**
**याभक्ता नांकलि दुरितो त्तप्तानां**
**ऽ ऽ ऽ ऽ।। ।।ऽ ऽऽऽ**
**तापच्छे देजल धरमा लानव्या ।**
**ऽऽऽ ऽ।। ।।ऽ ऽऽऽ**
**भव्याका रादिन करपु त्रीकूले**
**ऽ ऽ ऽ ऽ।। ।।ऽ ऽऽऽ**
**केलीलो लाहरि तनुर व्यात्सावः ।।**
**ऽ ऽ ऽ ऽ।। ।।ऽ ऽ ऽ ऽ**

**या भक्तानां कलिदुरितोत्तप्तानां**
**तापच्छेदे जलधरमाला नव्या ।**
**भव्याकारा दिनकरपुत्री कूले**
**केलीलोला हरितनुरव्यात सा वः ।।**

**जलोद्धतगति -**

लक्षण - **रसैर्जसजसा जलोद्धतगतिः ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे ज, स, ज, स असे गण येतात, त्याला 'जलोद्धतगति' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात बारा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात सहाव्या अक्षरावर व त्यानंतर सहाव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (६, ६)

उदाहरण -

**ज स ज स**

**समीर शिशिरः शिरस्सु वसताम्**

**।ऽ। । । ऽ ।ऽ। । । ऽ**

**सतांज वनिका निकाम सुखिनाम् ।**

**।ऽ। । । ऽ ।ऽ। । । ऽ**

**बिभर्ति जनय न्नयंमु दमपा -**

**।ऽ। ।।ऽ ।ऽ। ।।ऽ**

**मपाय धवला बलाह कततीः।।**

**।ऽ। ।।ऽ ।ऽ। ।।ऽ**

**समीरशिशिरः शिरस्सु वसताम्**

**सतां जवनिका निकामसुखिनाम् ।**

**बिभर्ति जनयन्नयं मुदमपा -**

**मपायधवला बलाहकततीः।।**

**तामरस -**

लक्षण - **इह वद तामरसं नजजा यः ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे न, ज, ज, य असे गण येतात, त्याला 'तामरस' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात तेरा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात पाचव्या अक्षरावर व त्यानंतर सातव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (५, ७)

उदाहरण -

**न ज ज य**

**स्फुटसु षमाम करन्द मनोज्ञम्**

**। । । ।ऽ। ।ऽ। । ऽ ऽ**

**व्रजल लनान यनालि निपीतम् ।**

**। । । ।ऽ। ।ऽ। । ऽ ऽ**

**तवमु खताम रसंमु रशत्रो**

**।।। । ऽ । ।ऽ। ।ऽऽ**

**हृदय तडाग विकाशि ममास्तु ।।**

**।।। ।ऽ। । ऽ । ।ऽऽ**

**स्फुटसुषमामकरन्दमनोज्ञम्**
**व्रजललनानयनालिनिपीतम् ।**
**तव मुखतामरसं मुरशत्रो**
**हृदयतडाग विकाशि ममास्तु ।।**

**प्रभा-**

लक्षण - **स्वरशरविरतिर्ननौ रौ प्रभा ।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे न, न, र, र असे गण येतात, त्याला 'प्रभा' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात बारा

अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात सातव्या अक्षरावर व त्यानंतर पाचव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (७, ५)

उदाहरण -

**न न र र**

**अतिसु रभिर भाजिपु ष्पश्रिया-**

**।।। ।।। ऽ।ऽ ऽ।ऽ**

**मतनु तरत येवसं तानकः ।**

**।।। ।।। ऽ।ऽ ऽ।ऽ**

**तरुण परभृ तःस्वनं रागिणा -**

**।।। ।।। ऽ । ऽ ऽ । ऽ**

**मतनु तरत येवस न्तानकः ।।**

**।।। ।।। ऽ।ऽ ऽ।ऽ**

**अतिसुरभिभाजि पुष्पश्रिया-**
**मतनुतरतयेव संतानकः ।**
**तरुणपरभृतः स्वनं रागिणा -**
**मतनुतरतये वसन्तानकः ।।**

**प्रमिताक्षरा** -

लक्षण - **प्रमिताक्षरा सजससैः कथिता।**

ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणात अनुक्रमे स, ज, स, स असे गण येतात, त्याला 'प्रमिताक्षरा' वृत्त असे म्हणतात. या वृत्ताच्या प्रत्येक चरणात बारा अक्षरे असतात. हे समवृत्त व अक्षरगणवृत्त आहे. यति प्रत्येक चरणात पाचव्या अक्षरावर व त्यानंतर सातव्या अक्षरावर म्हणजेच पादान्ती असतो. (५, ७) 

